अंगणवाडी केंद्र इमारत बांधकामासाठी निश्चित केलेल्या नमुना आराखडा (Type Plan) प्रमाणे बांधकाम खर्चाची वित्तीय मर्यादा वाढविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एबावि-२०१८/प्र.क्र. ७६/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ११ ऑक्टोबर, २०१८

**संदर्भ :-** (१) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२००८/प्र.क्र.१७३/का.६ दिनांक १५ जानेवारी , २०१०
(२) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२००८/प्र.क्र.१७३ (भाग-१)/का.६ दिनांक २० एप्रिल , २०११
(३) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२०१३/प्र.क्र.१५८/का.६ दिनांक २९ जानेवारी , २०१४

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत राज्यात अंगणवाडया चालविण्यात येतात. अंगणवाडयांच्या इमारती बांधण्यासाठी दिनांक १५ जानेवारी २०१० च्या शासन निर्णयानुसार आराखडा निश्चित करण्यात आला असून बिगर आदिवासी क्षेत्रासाठी एका अंगणवाडी बांधकामासाठी रुपये ६.०० लाख व आदिवासी क्षेत्रासाठी रुपये ६.६० लाख इतका निधी मंजूर करण्यात येतो.

२. शासनाच्या विविध योजनांतर्गत अंगणवाडी बांधकामासाठी निधी उपलब्ध होत असून त्यामध्ये प्रामुख्याने जिल्हा वार्षिक योजना, १३ वा वित्त आयोग, नाबार्ड, अल्पसंख्याक विभाग, मानव विकास मिशन तसेच मनेरेगा अंतर्गत निधी प्राप्त होत असतो. अंगणवाडी इमारत बांधकाम करण्यासाठी जागा मोफत ग्रामपंचायतीकडून उपलब्ध होणे आवश्यक आहे. अंगणवाडी बांधकामासाठी निधी मंजूर केल्यानंतर सदर आर्थिक वर्षात जागा उलब्ध न झाल्यास, तसेच पाण्याचा दुष्काळ असल्यास विहित कालावधीत इमारतीचे बांधकाम पुर्ण करुन घेणे जिल्हा परिषदेस शक्य होत नाही. परिणामत: मोठयाप्रमाणावर निधी अखर्चित रहातो. तसेच पुढील वर्षी साहित्याच्या भावात वाढ झाल्यामुळे निविदाधारक कंत्राटदार हे अपुर्ण बांधकाम पुर्ण करण्यास विलंब लावतात. अलिकडे बांधकाम साहित्याच्या रक्कमेत वाढ झालेली असल्यामुळे प्रति अंगणवाडी केंद्र इमारत बांधकाम रक्कमेत वाढ करण्याबाबत जिल्हास्तरावरुन मागणी होत आहे. अंगणवाडी केंद्र इमारत बांधकामाच्या सध्याच्या रक्कमेत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अंगणवाडी केंद्र इमारती बांधण्यासाठी दिनांक १५ जानेवारी २०१० च्या शासन निर्णयानुसार आराखडा निश्चित करण्यात आलेला आहे. सदर आराखडयानुसार अंगणवाडी केंद्र इमारत बांधण्यासाठी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षापासून **बिगर आदिवासी क्षेत्रासाठी एका अंगणवाडी केंद्र इमारत बांधकामासाठी रुपये ८.५० लाख ( GST सह)** व **आदिवासी क्षेत्रासाठी एका अंगणवाडी**

**केंद्र इमारत बांधकामासाठी रुपये ९.४० लाख (GST सह)** इतका निधी मंजूर करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. या शासन निर्णयानुसार लागु करण्यात येत असलेले नविन दर हे सन २०१८-१९ या वित्तीय वर्षापासून लागु रहातील. सदर रक्कमेत GST चा अतंर्भाव करण्यात आलेला आहे. यापुर्वी मंजूरी दिलेल्या /अपुर्ण असलेली बांधकामे पुर्ण करण्यासाठी जुने दर लागु रहातील.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १३७/१४७२, दिनांक ०१/०९/२०१८ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १९७/२०१८/व्यय-६, दिनांक १४/०९/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१११७०८३८१७३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.10.11 17:10:52 +05'30'

**( ला.रा. गुजर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.विरोधी पक्ष नेता,विधानसभा/विधानपरिषद,विधानभवन,मुंबई
४. मा.मंत्री/राज्यमंत्री (महिला व बाल विकास) ,मंत्रालय,मुंबई
५. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री , मंत्रालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव ,महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव ( नियोजन) ,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
१०.प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
११.सचिव, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१२.सचिव,ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१३.सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
१४.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय
१५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६.सर्व विभागीय आयुक्त
१७.आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य,नवी मुंबई
१८. आयुक्त,महिला व बाल विकास ,पुणे

१९.सर्व जिल्हाधिकारी
२०.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२१.सर्व विभागीय उप आयुक्त,महिला व बाल विकास विभाग
२२.सर्व महिला व बाल विकास अधिकारी ( जिल्हा परिषद)
२३.सर्व  बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रमीण/नागरी/आदिवासी प्रकल्प)
२४.महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
२५.महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व परिक्षा), मुंबई / नागपूर
२६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२७.सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद बांधकाम विभाग
२८. सर्व सहसचिव/उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
२९.निवड नस्ती (का-६).